**मुद्रा बँक योजनेचा लाभ जास्तीत जास्त गरजुंना मिळावा यासाठी राज्यस्तरावरुन माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत प्रचार व प्रसार करण्यासाठी घ्यावयाच्या विविध बाबींना प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एसएलबीसी-१६१८/प्र.क्र.२०/का.१४१७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ११ ऑक्टोबर, २०१८.

**संदर्भ:**

१. नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसएलबीसी-१६१६/प्र.क्र.४९/का.१४१७, दि.१४ जून, २०१६.
२. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२ एप्रिल, २०१८.

**प्रस्तावना:**

नियोजन विभागाचे संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मुद्रा बँक योजना ग्रामीण, दुर्गम आणि अती दुर्गम भागात प्रभावीपणे माहिती होण्यासाठी आणि या योजनेचा लाभ गरजू आणि होतकरु व्यक्ती आणि बेरोजगार यांना व्हावा या हेतूने ग्रामीण आणि दुर्गम भागातील जनमानसात प्रभावीपणे प्रचार, प्रसार आणि समन्वय करण्याकरिता जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली मुद्रा बँक योजना समन्वय समितीची स्थापना करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयास अनुलक्षून मुद्रा बँक योजना जिल्हा समन्वय समितीकडून अपेक्षित खर्चाबाबत प्रस्ताव मागविण्यात येतात व मागणीनुसार जिल्हयांना निधी उपलब्ध करुन दिला जातो.

२. केंद्र शासनाने सन २०१८-१९ चे अर्थसंकल्प सादर करताना प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेअंतर्गत आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये रु. ३ लक्ष कोटीचे कर्जवाटप करण्याचे उद्दिष्ट निश्चित केले आहे. या पार्श्वभूमीवर आर्थिक वर्ष २०१८-१९ करीता राज्यासाठी सुद्धा प्रधानमंत्री मुद्रा योजनेअंतर्गत वाढीव उद्दिष्ट प्राप्त झालेले आहे. राज्यातील राष्ट्रीयकृत व खाजगी बँका व वित्तीय संस्थांकडून आर्थिक वर्ष २०१८-१९ करीता वाढीव उदिष्ठानुसार जास्तीत जास्त गरजूंना प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेंतर्गत कर्ज पुरवठा होण्याच्या दृष्टीने राज्यातील सर्व जिल्ह्यातील विशेषत: ग्रामीण व दुर्गम भागातून योजनेची प्रचार व प्रसिद्धी करणे क्रमप्राप्त आहे. उपरोक्त बाब लक्षात घेऊन प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेच्या प्रचार व प्रसिद्धीचा राज्यस्तरीय आराखडा तयार करून माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१. प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेच्या राज्यस्तरावरून करावयाच्या प्रचार व प्रसिद्धीसंबंधी खालीलप्रमाणे कामे माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत हाती घेण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | प्रचार व प्रसाराचे शीर्ष / बाब | अपेक्षित खर्च (अंदाज रक्कम) |
|---|---|---|
| १ | राज्यातील सर्वाधिक खपाच्या वृत्तपत्रातून योजनेच्या प्रसिद्धीसाठी जाहिरात देणे तसेच यशोगाथा प्रसिद्ध करणे. | १५,१०,०००/- |
| २ | आकाशवाणीवर प्रसारित होणाऱ्या बातम्यांच्या पूर्वी प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेच्या माहिती संबंधीची जिंगल प्रसारित करणे. | ५०,४०,०००/- |
| ३ | गजबजलेल्या/प्रमुख ८० बसस्टॅण्डवर म्हणजेच FOOT FALLS (फूटफॉल्स) च्या ठिकाणी योजना प्रसिद्धीची जिंगल्स प्रसारित करणे. | २,०७,३६,०००/- |
| ४ | थिएटर मध्ये योजना प्रसिद्धीची व्हिडिओ जिंगल्स प्रसारित करणे. | १६,००,०००/- |
| ५ | सोशल मिडिया (Twitter, WhatsApp, Facebook, Instagram, Youtube) माध्यमातून प्रचार / प्रसिद्धी करणे. | २०,००,०००/- |
| ६ | लोकप्रिय मराठी वाहिन्या व मराठी वृत्त वाहिन्या यावर प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेच्या माहिती संबंधीची व्हिडिओ जिंगल प्रसारित करणे. | २,५२,००,०००/- |
| ७ | प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेतील यशस्वी व्यावसायिकांच्या मुलाखती घेणे व त्याचे आकाशवाणीवरून प्रसारण करणे. | १०,२०,०००/- |
| ८ | महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाच्या बस स्थानकांच्या आवारातील होर्डिंग्स वर त्याचप्रमाणे बस मधील सीटच्या मागील बाजूस प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेची जाहिरात प्रसिद्ध करणे. | २,१६,००,०००/- |
| ९ | मोबाईल अँप गो लाईव्ह करून योजनेचे सनियंत्रण करणेसाठी उपयोग करून घेणे. | ४०,००,०००/- |
| १० | प्रवास तिकिटेच्या मागील बाजूस योजनेची जाहिरात प्रसिद्ध करणे. | १५,००,०००/- |
| ११ | डिजिटल पद्धतीने तयार केलेल्या बॅनर्स द्वारे प्रचार / प्रसिद्धी करणे. | ३५,००,०००/- |
| १२ | मुद्रा पोर्टल करिता "Content & Service Provider" Agency ची नेमणूक करणे. | २५,००,०००/- |
| | अक्षरी रुपये नऊ कोटी दोन लाख सहा हजार फक्त | ९,०२,०६,०००/- |

वरील तक्त्यामधील अ.क्र. १ ते १२ वरील शीर्ष / बाब संबंधित प्रचार व प्रसिद्धीची कार्यवाही माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात करण्यात यावी. तसेच याकरिता रु. ९,०२,०६,०००/- व १८% जी.एस.टी. रु. १,६२,३७,०८०/- असे एकूण खर्च रु. १०,६४,४३,०८०/- (अक्षरी दहा कोटी चौसष्ट लाख त्रेचाळीस हजार ऐंशी फक्त) यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदरहू निधी खर्च करताना संदर्भाधीन शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचे तसेच वित्त विभागाने संदर्भिय शासन परिपत्रकामध्ये दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

२. प्रधानमंत्री मुद्रा बँक योजनेच्या प्रचार व प्रसिद्धीची माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून विहीत केलेली शीर्ष / बाब निहाय कामे तातडीने पूर्ण करून घेणे आवश्यक आहे. वरील तक्त्यामधील अ.क्र. १ ते १२ वरील शीर्ष / बाब निहाय कामे करण्यासाठी कार्यक्षम संस्था निवड करण्याची प्रक्रिया माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून शासन कार्यपध्दतीनुसार करण्यात येईल. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: मावज-२०१७/प्र.क्र.१५३/का-३४, दिनांक २१ जुलै, २०१७ मधील परिच्छेद क्रमांक १४ मध्ये कामाची योग्य पडताळणी केल्यानंतर प्रशासकीय विभागाकडून देयक अदा केले जाईल तसेच परिच्छेद क्रमांक ८ मध्ये निवड यादीवरील संस्थांना जाहीरातींचा सर्जनशील मसुदा (ड्राफ्ट क्रिएटिव्ह) तयार करण्यासाठी ८ ते १० दिवसांचा कालावधी देण्यात येईल, असे नमूद करण्यात आले आहे. सदर सर्जनशील मसुदा (ड्राफ्ट क्रिएटिव्ह) माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने अंतिम करण्यापूर्वी नियोजन विभागाकडून अंतिम सहमती प्राप्त करुन घेणे आवश्यक राहील.

३. उपरोक्त निधी हा लेखाशीर्ष मागणी क्रमांक ओ-७, ३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (०१) नियोजन विभाग, (०१) (११) मुद्रा बँक योजनेचा प्रचार, प्रसार आणि समन्वय (योजनांतर्गत) (दत्तमत), २६ जाहिरात व प्रसिध्दी (३४५१ अे ००१) या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२ एप्रिल, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारास अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१८१०१११५४३५९१३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2018.10.11 15:46:41 +05'30'

**( प्रियांका रं. छापवाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई - ४०० ०३२.

२. महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई - ४०० ०३२.
४. महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, मुंबई - ४०० ०३२.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई - ४०० ०३२.
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
७. वित्त विभाग / व्यय-८, अर्थ-१६, मंत्रालय, मुंबई ३२.
८. कार्यासन अधिकारी (का. १४११ / १४२४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
९. निवडनस्ती, कार्यासन १४१७.